**गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३ पदांना दिनांक १/१०/२०१६ ते दिनांक ३०/०९/२०१७ पर्यंत व ३१ पदांना दिनांक ३०/११/२०१६ ते ३०/९/२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मुदतवाढ २०१७/(७३/२०१७)/मोप्र-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ /०७ /२०१७.

**<u>पहावे</u> :** १) जलसंपदा विभाग,शासन निर्णय क्रमांक: मुदतवाढ २०१६/(३३/१६)/ मोप्र २, दिनांक ०६/०४/२०१६,

२) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे क्र. गोमपाविम/आ-१/४८९८, दिनांक २२/०६/२०१७ रोजीचे पत्र,

३) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दिनांक २१/०९/२०१६,

४) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. आढावा-२०१६/प्र.क्र.१७५/२०१६/आ.(प्रशि), दिनांक ३०/११/२०१६.

५) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क,, दिनांक १०/०२/२०१७.

**<u>प्रस्तावना :-</u>**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील कार्यकारी संचालक-१ पद, मुख्य लेखा व वित्त अधिकारी- १ पद व अधीक्षक अभियंता-१ पद या ३ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०१६ ते दिनांक ३०/०९/२०१६ पर्यंत चालू ठेवण्यास वरील संदर्भीय क्रमांक १ च्या जलसंपदा विभागाच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली होती. संदर्भ क्रमांक ३ व ५ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतिबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना संदर्भ क्रमांक ३ अन्वये दिनांक २८/०२/२०१७ पर्यंत व संदर्भ क्रमांक ५ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दिनांक ३०/०९/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत. संदर्भ क्रमांक ४ च्या जलसंपदा विभागाच्या शासन निर्णयान्वये जायकवाडी प्रकल्प मंडळ, औरंगाबाद अंतर्गत बंद होणाऱ्या विभागीय व ३ उपविभागीय कार्यालयांतर्गतच्या मंजूर पदांमधून गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद कार्यालयासाठी ३१ पदे उपलब्ध करुन देण्यात आली आहेत. आता संदर्भ क्रमांक २ च्या अनुषंगाने गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांच्या मागणीनुसार त्यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३ पदांना दिनांक ०१/१०/२०१६ ते ३०/०९/२०१७ पर्यंत व संदर्भ क्रमांक ४ च्या अन्वये उपलब्ध झालेल्या ३१ पदांना दिनांक ३०/११/२०१६ ते ३०/०९/२०१७ पर्यंत अशा एकूण ३४ पदांना चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाचे विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३ पदांना (परिशिष्ट - अ) मध्ये दर्शविल्याप्रमाणे दिनांक ०१/१०/२०१६ ते ३०/०९/२०१७ पर्यंत व ३१ पदांना (परिशिष्ट - ब) मध्ये दर्शविल्याप्रमाणे दिनांक ३०/११/२०१६ ते ३०/०९/२०१७ पर्यंत अशा एकूण ३४ पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.
२) ही पदे आकृतीबंधानूसार मंजूर असतील व सहा महिन्याहून अधिक कालावधीसाठी रिक्त नसतील.

यावर होणारा खर्च मागणी क्रमांक आय-५ ( नियत अस्थायी आस्थापना ) ४७०१-मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (०४) योजनेतर- वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान (०४) (०५) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१ आय २०४) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व महामंडळास वेतनासाठी मंजूर असलेल्या योजनेतर तरतूदीतून भागविण्यात यावा.

उपरोक्त सर्व बाबी तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ वित्तीय सुधारणा-१, दिनांक २१/०९/२०१६ व वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि-२०१६/ प्र.क्र. ८ / १६/ आ.पु.क, दिनांक १०/०२/२०१७ नुसार प्राप्त झालेल्या सहमतीनुसार व प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतरवित्त सल्लागार व उप सचिव यांचे सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०७२६१६११२४८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Ajay K Pawar
Date: 2017.07.26 16:16:33 +05'30'

**सहपत्र : परिशिष्ट अ व ब**

**( अजय क. पवार )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत सहपत्रासह -**

१. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
४. वित्त विभाग (व्यय-१२),मंत्रालय, मुंबई.
५. आ-(प्रशि)/अर्थ-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
६. मोप्र-२ कार्यासन संग्रहार्थ.

## प्रपत्र-अ

**शासन निर्णय क्र : मुदतवाढ-२०१७/प्र.क्र.७३/२०१७/मोप्र-२ दिनांक २६/०७/२०१७ चे सहपत्र.**
**नियत अस्थायी आस्थापना एकूण ३ पदे**
**कालावधी दिनांक ०१/१०/२०१६ ते ३०/०९/२०१७ या कालावधीसाठी नियत अस्थायी पदे.**

| अ.क्र. | कार्यालयाचे नांव | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद | कार्यकारी संचालक | १ |
| | | मुख्य लेखा व वित्त अधिकारी | १ |
| | | अधीक्षक अभियंता | १ |
| | | **एकुण :-** | **३** |

## प्रपत्र-ब

**शासन निर्णय क्र : मुदतवाढ-२०१७/प्र.क्र.७३/२०१७/मोप्र-२ दिनांक २६/०७/२०१७ चे सहपत्र.**
**नियत अस्थायी आस्थापना एकूण ३१ पदे**
**कालावधी दिनांक ३०/११/२०१६ ते ३०/०९/२०१७ या कालावधीसाठी नियत अस्थायी पदे.**

| अ.क्र. | कार्यालयाचे नांव | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद | प्रथम लिपिक | १ |
| | | वरिष्ठ लिपिक | ६ |
| | | कनिष्ठ लिपिक | ६ |
| | | लिपिक टंकलेखक / टंकलेखक | ५ |
| | | लघु टंकलेखक | १ |
| | | वाहन चालक | २ |
| | | शिपाई | ९ |
| | | चौकीदार | १ |
| | | **एकुण :-** | **३१** |